**प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम फेज-२ (RCH) अंतर्गत कंत्राटी पध्दतीने मानधन तत्वावर कार्यरत असलेल्या ३७ अधिकारी / कर्मचाऱ्यांपैकी ४ अधिकारी यांचे चंदपूर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील आकृतीबंधातील मंजूर पदांवर समावेशन व ३३ कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदे निर्माण करुन त्यावर नियुक्ती देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक - चंमपा-१४२२/प्र.क्र.१६१/नवि-२६**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १६ जून, २०२३

<u>वाचा :-</u> १) आयुक्त, चंद्रपूर महानगरपालिका यांचे पत्र क्र.चंमपा/आस्था/२३२४/२०२२, दि.३१.१०.२०२२.

२) आयुक्त, चंद्रपूर महानगरपालिका यांचे पत्र क्र.चंमपा/आस्था/९१४/२०२२, दि.०७.१२.२०२२.

३) आयुक्त, चंद्रपूर महानगरपालिका यांचे पत्र क्र.चंमपा/आस्था/३१८७/२०२३, दि.१३.१.२०२३.

४) शासन निर्णय क्र. चंमपा-१४२३/प्र.क्र.२/नवि-२६, दि.१३.०२.२०२३

<u>प्रस्तावना :-</u>

प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम फेज-२ (RCH) या योजनेतील कंत्राटीपध्दतीने मानधनावर कार्यरत ३७ अधिकारी/कर्मचारी यांना चंद्रपूर महानगरपालिकेच्या मान्यता प्राप्त आकृतीबंधातील ४ एकाकी पदांवर नियमित सेवेत समावेशन करण्याबाबत तसेच उर्वरित ३३ कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदांवर समावेशन करण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, चंद्रपूर महानगरपालिका यांनी त्यांच्या संदर्भाधिन क्रमांक ३ येथील दि.१३ जानेवारी, २०२३ च्या पत्रान्वये सादर केला आहे.

२. राज्यातील महानगरपालिकांमध्ये आरोग्य सेवा देण्याकरीता प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम फेज-२ (RCH) सन २००६ मध्ये सुरु करण्यात आला होता. सदर कार्यक्रम राष्ट्रीय आरोग्य अभियान या कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येत असून त्याकरीता कोणताही वेगळा कर्मचारीवृंद मंजूर करण्यात आला नाही. सदर कार्यक्रम हा केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार सन २००५-२०१५ या कालावधीकरीता मंजूर करण्यात आला होता. सन २०१५-२०१६ पासून आजतागायत चंद्रपूर महानगरपालिका या कर्मचाऱ्यांच्या वेतनावरील पूर्ण खर्च उचलित आहे.

३. चंद्रपूर महानगरपालिका आयुक्त तथा प्रशासक यांचा ठराव क्र. ७२, दि.०४ ऑक्टोबर, २०२२ अन्वये या प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रमांतर्गतची पदे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर घेण्यासाठी

मान्यता दिली. यानुसार प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम फेज-२ (RCH) या योजनेतील कार्यरत ३७ अधिकारी/कर्मचारी यांना चंद्रपूर महानगरपालिकेच्या मान्यता प्राप्त आकृतीबंधातील ४ एकाकी पदांवर सेवेत समावेशन करण्याबाबत, तसेच उर्वरित ३३ कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदांवर समावेशन करण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, चंद्रपूर महानगरपालिका यांच्याकडून प्राप्त झाला होता.

४. राष्ट्रीय प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम फेज-२ (RCH) योजनेंतर्गतच्या ३८ कर्मचाऱ्यांपैकी एका कर्मचा-याचा मृत्यू झाला असून, सद्यस्थितीत राष्ट्रीय प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम अंतर्गत ३७ कर्मचारी कार्यरत असून, त्यापैकी ०४ वैद्यकीय अधिकारी, ०१ शहर कार्यक्रम व्यवस्थापक, ०२ पी.एच.एन., २२ ए.एन.एम., ०१ अकाउन्टंट कम डाटा एन्ट्री ऑपरेटर, ०४ लिपिक कम डाटा एन्ट्री ऑपरेटर व ०३ शिपाई या पदावर कार्यरत आहेत. चंद्रपूर महानगरपालिकेच्या मंजूर आकृतीबंधात राष्ट्रीय प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रमांतर्गतची सध्या कार्यरत असलेली वैद्यकीय अधिकारी यांची ०२ ही पदे मंजूर असून, महानगरपालिकेच्या सुधारित आकृतीबंधात वैद्यकीय अधिकारी यांचे ०२ पदांची निर्मिती करण्यात आलेली आहे. प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रमांतर्गत चंद्रपूर महानगरपालिकेत सद्यस्थितीत कार्यरत असलेल्या सदर ३७ अधिकारी/कर्मचारी यांची नियुक्ती ही मानधनावर झाली आहे. विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करून, वर्तमानपत्रात जाहिरात प्रसिध्द करुन, मुलाखतीसाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांची निवड समितीमार्फत तोंडी मुलाखत घेऊन गुणवत्तेनुसार करुन नियुक्ती करण्यात आली आहे. सदर अधिकारी/कर्मचारी सन २००६ पासून कंत्राटी पध्दतीने कार्यरत आहेत.

५. यास्तव, प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम फेज-२ (RCH) या योजनेतील कार्यरत ३७ अधिकारी/ कर्मचारी यांना चंद्रपूर महानगरपालिकेच्या मान्यता प्राप्त आकृतीबंधातील ४ एकाकी पदांवर सेवेत समावेशन करण्याबाबत, तसेच उर्वरित ३३ कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदे निर्माण करुन त्यावर समावेशन करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>** :-

**(अ)** चंद्रपूर महानगरपालिकेतील राष्ट्रीय प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम फेज-२ (RCH) या कार्यक्रमांतर्गत मानधन तत्वावर कार्यरत असलेल्या वैद्यकीय अधिकारी (राष्ट्रीय/राज्य आरोग्य कार्यक्रम) - १ पद, वैद्यकीय अधिकारी (राष्ट्रीय / राज्य आरोग्य कार्यक्रम व्यतिरीक्त (जन्म मृत्यु व विवाह नोंदणी सह) - १ पद, वैद्यकीय अधिकारी (पी.सी.पी.एन.डी.टी., एम.टी.पी., इत्यादि कायदे अंमलबजावणी) - १ पद, वैद्यकीय अधिकारी (महाराष्ट्र शुश्रुषागृह नोंदणी अधिनियम इत्यादि कायदे अंमलबजावणी) - १ पद या ०४ पदांवर ०४ वैद्यकिय अधिकाऱ्यांचे आकृतीबंधातील मंजूर व रिक्त पदांवर खालील अटीं व शर्तीच्या आधारे समावेशन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) या अधिकारी/कर्मचाऱ्यांचे शासन निर्णयाच्या दिनांकापासून महानगरपालिकेच्या मंजूर आकृतीबंधातील समकक्ष पदांवर समावेशन करण्यात यावे. ज्या पदावर त्यांचे समावेशन करण्यात येईल त्या पदाची अर्हता त्यांनी पूर्ण करणेही आवश्यक राहील.

२) या अधिकारी/कर्मचाऱ्यांना समावेशनाच्या दिनांकापासून कायम सेवेचे तद्नुषंगिक लाभ (वेतन, सेवा जेष्ठता, निवृत्तीवेतन इत्यादी) देय राहतील.

३) सदर कर्मचाऱ्यांना त्यांनी यापूर्वी केलेल्या सेवेचे कोणतेही लाभ अथवा थकबाकी अनुज्ञेय नसेल.

४) सदर कर्मचाऱ्यांच्या समावेशनानंतर त्यांच्या वेतनाकरीता कोणताही निधी शासनाकडून उपलब्ध करुन दिला जाणार नाही.

५) समावेशन करण्यात आलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्याचे पद त्यांच्या सेवानिवृत्ती किंवा इतर कारणास्तव रिक्त झाल्यास सदर पद महानगरपालिकेच्या सेवा प्रवेश नियमानुसार विहित प्रक्रियेचा अवलंब करुन भरणे बंधनकारक राहील.

**(ब)** राष्ट्रीय प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम फेज-२ (RCH) या कार्यक्रमांतर्गत कार्यरत, शहर कार्यक्रम व्यवस्थापक-०१ पद, पी.एच.एन.-०२ पदे, ए.एन.एम.-२२ पदे, अकाउन्टंट कम डाटा एन्ट्री ऑपरेटर-०१ पद, लिपिक कम डाटा एन्ट्री ऑपरेटर-०४ पदे, व शिपाई-०३ पदे अशा एकूण ३३ अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी एक वेळची विशेष बाब म्हणून महानगरपालिका स्तरावर अधिसंख्य पदे निर्माण करून त्यांना अधिसंख्य पदांवर खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून नियुक्ती देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

<u>अटी व शर्ती-</u>

१) या कर्मचाऱ्यांना निर्माण करण्यात आलेल्या समकक्ष अधिसंख्य पदांवर शासन निर्णयाच्या दिनांकापासून नियुक्ती देण्यात यावी.

२) या कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावरील पदस्थापनेच्या दिनांकापासून कायम सेवेचे तद्नुषंगिक लाभ (वेतन, सेवा जेष्ठता, निवृत्तीवेतन इत्यादी) देय राहतील.

३) सदर कर्मचाऱ्यांना त्यांनी यापूर्वी केलेल्या सेवेचे कोणतेही लाभ अथवा थकबाकी अनुज्ञेय नसेल.

४) सदर कर्मचाऱ्यांच्या वेतनाकरीता कोणताही निधी शासनाकडून उपलब्ध करुन दिला जाणार नाही.

५) सदर अधिसंख्य पदांवर प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम फेज- २ (RCH) कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त अन्य कोणाचीही नियुक्ती करता येणार नाही.

६) सदरचे अधिसंख्य पदे कोणत्याही कारणास्तव रिक्त झाल्यास ते त्या दिनांकापासून आपोआप व्यपगत होतील.

७) सदर कर्मचाऱ्यांना एक वेळची बाब म्हणून नियमित करण्यासाठी निर्माण करण्यात आलेली अधिसंख्य पदे त्यांच्या सेवानिवृत्तीनंतर अथवा इतर कारणास्तव रिक्त झाल्यास आपोआप

व्यपगत होत असल्याने, त्यांच्या वारसदारांना नियुक्ती देण्यासाठी कोणतेही अधिसंख्य पद निर्माण करण्यात येणार नाही अथवा व्यपगत झालेले पद पुनर्जिवित करता येणार नाही.

८) सदर कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर नियुक्ती देतांना त्यांची वेतनश्रेणी त्या पदाच्या समकक्ष वेतनश्रेणीपेक्षा जास्त असणार नाही याची आयुक्त, चंद्रपूर शहर महानगरपालिका यांनी दक्षता घ्यावी.

९) पुढील आर्थिक वर्षापर्यंत महानगरपालिकेचा आस्थापना खर्च ३५% च्या मर्यादेत येण्याच्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करावी.

१०) जोपर्यंत महापालिकेचा आस्थापना खर्च विहित मर्यादेत येत नाही. तोपर्यंत नवीन पदनिर्मितीचा कोणताही प्रस्ताव शासनाकडे मंजुरीसाठी पाठविण्यात येऊ नये.

**(क)** उपरोक्त **(अ)** व **(ब)** च्या अनुषंगाने सदर अधिकारी/कर्मचाऱ्यांचे चंद्रपूर महानगरपालिकेत समावेशन करण्याकरिता महानगरपालिकांसाठी विहित केलेली ३५% आस्थापना खर्चाची अट शिथील करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१६१९०३००५९२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2023.06.16 19:03:55 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. आयुक्त, चंद्रपूर महानगरपालिका, चंद्रपूर.

५. निवड नस्ती (नवि-२६).